**राष्ट्रीय ग्रामिण पेयजल कार्यक्रम (NRDWP) पेयजल स्त्रोत शाश्वतते अंतर्गत दुहेरी पंपावर आधारीत पाणी पुरवठा योजना.**

महाराष्ट्र शासन
पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग,
शासन निर्णय क्र. ग्रापापु-५३१०/प्र.क्र.०४/पापु-१५
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक :- ११ जानेवारी, २०१०

वाचा: या विभागाचा शासन निर्णय,क्र. ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४/पापु-०७ दि. १ ऑगस्ट २००९.

प्रस्तावना :

राज्यातील ग्रामीण जनतेला पिण्याच्या पाण्याचा योग्य प्रमाणात व योग्य गुणवत्तेचा शाश्वत पुरवठा व्हावा, यासाठी राज्य शासन नळ पाणी पुरवठा योजना, विंधण विहीर, लघु पाणी पुरवठा योजना व तत्सम अनेक उपाययोजना राज्यात राबविण्यात येत आहेत.

केंद्र शासनाच्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रमाच्या (NRDWP) सुधारीत मार्गदर्शक सूचनांनूसार शासनाने राज्यात ग्रामीण पाणी पुरवठा कार्यक्रमाच्या अंमलबजावणीसाठी सुधारीत मार्गदर्शक सूचना उपरोक्त शासन निर्णयान्वये निर्गमित केल्या आहेत. सदर कार्यक्रमामध्ये पेयजल स्त्रोत शाश्वती (Source Sustainability) वर जास्त भर दिला असून पाणी पुरवठयासाठी पिण्याच्या पाण्याचे उद्‌भव बारमाही टिकविणे अत्यंत आवश्यक आहे. पाण्याच्या उपशावर व वापरावर नियंत्रण असणे यासाठी आवश्यक आहे. तसेच आवश्यक तेथे विंधणविहीरींचे पुनर्भरण करणेही गरजेचे आहे. असे केल्यास, ग्रामिण भागातील लहान वाडया/वस्त्यांना बारमाही पाणी उपलब्ध होऊ शकेल व उन्हाळ्यात टँकरद्धारे पाणी पुरवठा करावा लागणार नाही.

भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेने अस्तीत्वात असलेल्या उच्च क्षमतेच्या विंधण विहीरींवर दुहेरी पंप व्यवस्था आधारित पाणी पुरवठा योजना विकसित केली आहे. त्यामध्ये भूजल उपशावर नियंत्रण व स्त्रोत बळकटीकरणाचा देखील अंतर्भाव आहे. पथदर्शी प्रकल्पामध्ये सदर योजनेचे लाभ मोठया प्रमाणावर दिसून आले आहेत. ग्रामीण जनतेची देखील अशा योजनेसाठी जास्त मागणी दिसून येते.

गावापासून दुरवर असलेल्या वाडया-वस्त्या, अनुसुचित जाती/जमाती/अल्पसंख्यांक वस्त्या यांना गावांतील नळ पाणी पुरवठा योजनेचा लाभ ब-याचदा मिळत नाही. अशा वस्त्यांवरील ग्रामीण जनतेला शाश्वत व गुणात्मक पिण्याचे पाणी किफायतशीर व अल्पदरात उपलब्ध करुन देणे, हे या योजनेचे उद्दीष्ट आहे. या योजनेद्वारे नळ पाणी पुरवठा योजनेचे लाभ जनतेला अत्यंत कमी खर्चात उपलब्ध करुन देणे शक्य होईल. या शिवाय वीज पुरवठा उपलब्ध असतांना विद्युतपंपाद्वारे तर विज पुरवठा नसतांना हातपंपाद्वारे सातत्याने पाणी उपलब्ध होईल.

अस्तित्वातील ज्या विधंण विहीरींची पाणी पुरवठा क्षमता किमान २८०० लि. ताशी आहे अथवा हातपंपातून बारमाही पाणी उपलब्ध होते, अशा विंधण विहीरी हया योजनेचा आधार आहेत. हातपंपाचे पाणी उपसण्यासाठी महिलांना मोठया प्रमाणावर कष्ट करावे लागतात. तसेच त्यासाठी त्यांना बराच वेळ देखील दयावा लागतो. उन्हाळ्यात पाणी पातळी खोल गेल्यावर हातपंप चालत नाही व तो लवकर नादुरुस्त होतो. यामुळे अनेकदा वाडी/वस्तीला टॅंकरद्वारे पाणी पुरवठा करावा लागतो. हे सर्व टाळण्यासाठी अशा विंधणविहीरीत अस्तित्वातील हातपंपासोबतच सिंगल फेजचा कमीत कमी अश्वशक्तीचा पाणबुडया (सबमर्सिबल) पंप बसवून त्याद्वारे ५००० लि. क्षमतेच्या टाकीमध्ये साठवून पाणी पुरवठा केल्यास ग्रामीण जनतेला नळ पाणी पुरवठा योजनेचे लाभ मिळू शकतील, तसेच महिलांचे अतिरिक्त कष्ट व वेळ वाचतील

सदर योजनेमध्ये काही आणखी सुधारणा करुन विंधण विहीरींच्या परिसरातील सुमारे ३० ते ४० घरांना घरगुती नळ जोडणीसह त्यांना नळ पाणी पुरवठा योजनेचे सर्व लाभ देऊन दुहेरी पंप व्यवस्थेवर आधारीत लघु नळ पाणी पुरवठा योजना राबविणे ही बाब शासनाच्या विचाराधीन होती.

***शासन निर्णय :-***

ग्रामीण भागातील पाणी पुरवठा शाश्वत व सुरक्षीत करण्यासाठी अशा वाड्या / वस्तीतील ज्या विधंण विहीरींची पाणी पुरवठा क्षमता किमान २८०० लिटर ताशी आहे अथवा हातपंपातून बारमाही पाणी उपलब्ध होते अशा विंधण विहीरीत अस्तित्वातील हातपंपासोबतच सिंगल फेजचा कमीत कमी अश्वशक्तीचा पाणबुडया (सबमर्सिबल) पंप बसवून त्याद्वारे ५००० लि. क्षमतेच्या टाकीमध्ये साठवून पाणी पुरवठा करण्यासाठी भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेने विकसित केली दुहेरी पंप व्यवस्था आधारीत पाणी पुरवठा योजना राबविण्यास शासन मान्यता देत आहे.

***योजनेच्या अंमलबजावणीसाठी मार्गदर्शक तत्वे :***

***वाडी-वस्तीच्या निवडीचे निकष :***

खालील निकषांची पुर्तता करणा-या वाड्या /वस्त्यामध्ये दुहेरी पंप व्यवस्था आधारित पाणी पुरवठा योजना राबविण्यात याव्यात.

- ज्या वाड्या-वस्त्या पेयजलासाठी फक्त विंधण विहिरीवर आधारीत आहेत अशा वाड्या/वस्त्या.
- ज्या गावांच्या गावठाणामध्ये नळ पाणी पुरवठा योजना आहे परंतु गावठाणामधील काही भाग/वाड्या-वस्त्यांना मात्र त्याद्वारे बारमाही शाश्वत पाणी उपलब्ध होत नाही असा भाग/अशा वाड्या-वस्त्या.

प्रस्तुत योजना ग्राम पंचायतींमार्फत राबविण्यात येतील. त्यासाठी आवश्यक ते तांत्रीक मार्गदर्शन भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेकडील वरिष्ठ भूवैज्ञानिक आणि वरिष्ठ अभियंत्याचे तसेच जिल्हा परिषदांकडील उप अभियंता (यांत्रिकी) यांचे असेल. योजनेचे स्वरुप,तांत्रीक तपशिल, योजनेसाठी आवश्यक साहित्य सामुग्रींचे तांत्रिक विनिर्देश इत्यादी बाबत सविस्तर माहिती ***जोडपत्र दोन*** मध्ये व सोबतच्या ***माहिती पुस्तिकेत*** देण्यात आलेली आहे.

प्रस्तुत योजना राबविण्यासाठी खालील मार्गदर्शक तत्वे विहित करण्यात येत असुन त्यानुसार अंमलबजावणी करण्यात यावी.

१. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद यांचे अध्यक्षतेखालील शिवकालीन पाणी साठवण योजना राबविणारी समितीच ही योजना देखील राबवील. तथापी या योजनेपुरता उप अभियंता (यांत्रिकी), भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,जि.प.यांचाही या समितीमधे सहभाग असेल.

२. योजनेच्या आवश्यकते बाबतचे प्रस्ताव संबंधीत ग्राम पंचायतींकडुन प्राप्त झाल्यावर उपरोक्त समितीने वाड्या /वस्त्यांची निवड निकषानुसार अंतीम करावी व त्या नंतर निवडलेल्या वाडी-वस्तीतील अस्तित्वातील विंधण विहिरींची क्षमता चाचणी घेऊन प्रस्तावित विंधण विहीर उच्च क्षमतेची/बारमाही पुरवठा क्षमतेची असल्याची खात्री करावी. ही कामे उप अभियंता (यांत्रिकी), भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, जिल्हा परिषद यांचे मार्फत करण्यात येतील. तसेच वाडी -वस्तीतील एकूण पेयजल स्रोत इ, बाबतच्या माहितीचा विचार गावे/वाड्या/वस्त्याची निवड अंतिम करण्यापुर्वी करण्यात यावा.

३. निवडलेल्या वाडी-वस्तीतील अस्तित्वातील विंधण विहिर क्षमता चाचणी अंती उच्च क्षमतेची / बारमाही पुरवठा क्षमतेची असल्याची खात्री झाली तरच योजनेस मंजुरी प्रदान करण्यात यावी.

४. योजना कार्यान्वित झाल्यावर ती सुरळीत पणे सुरु असावी यासाठी भविष्यातील देखभाल दुरुस्ती, विजेची देयके अदा करणे व इतर अनुषांगिक बाबींवरील सर्व खर्च व जबाबदारी संबंधित ग्रामपंचायतीची असेल या बाबतचा ठराव ग्राम पंचायतीने देणे अनिवार्य असेल.

५. योजनेसाठी आवश्यक विद्युतपंप संच, HDPE पाण्याची टाकी, HDPE पाईप्स इत्यादी साहित्य सामुग्रीची खरेदी संचालनालयाने निश्चीत केलेल्या व जोडपत्र -२ मधे नमुद केलेल्या तांत्रीक विनिर्देशानुसारच होत असल्याबाबतची शहानिशा जिल्हा परिषदांनी करावी.

६. प्रस्तुत योजना भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेने संशोधीत व विकसित करताना भूजलाचा उपसा पिण्याच्या पाण्याचा प्रश्न सोडविण्यासाठी आवश्यक तेवढ्याच मर्यादेत असावा या उद्देशाने किमान अश्वशक्तीचा सिंगल फेजचा विद्युत पंप प्रस्तावीत केलेला आहे,

७. एकाच विंधण विहिरीत विद्युत पंप आणि हातपंप उभारणी करता यावी यासाठी विशिष्ट वॉटर चेंबर विकसीत केलेले असावे.

८. भुजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणेच्या संकल्पनेनुसार योजना राबविण्यासाठी व जोडपत्र-१ मधील तांत्रिक विनिर्देशानुसार गुणात्मक योग्य साहित्याची खरेदी करणे, पंपांची उभारणी प्रस्तुत पद्धतीनुसार करणे भुजल पुनर्भरण करणे या साठी भुजल सर्वेक्षण व विकास यंत्रणेकडील वरिष्ठ खोदन अभियंत्याचे व वरिष्ठ भूवैज्ञानिक यांचे या योजनांवर पर्यवेक्षण असेल.

९. या योजनेचा प्रमुख उद्देश हा ग्रामीण भागातही घरोघरी नळ जोडणीने शुध्द स्वच्छ व शाश्वत पाणी पुरवठा करणे हा असल्यामुळे साठवण टाकी जमीनी पासुन योग्य उंचीवर उभारणी करणे, हातपंपासाठी आवश्यक ते बांधकाम करणे,वितरण व्यवस्थेसाठी पाईपलाईन, रुफ टॉप रेन वॉटर हार्वेस्टींग स्ट्रक्चर वा अन्य भूजल पुनर्भरणाचे उपाय करणे अशा विविध उपयोजनाद्वारे ही योजना पुर्ण करण्यात येईल.

१०. प्रचलित विहीत शासकीय पध्दतीने, रु. २.५० लक्ष खर्चाच्या मर्यादेतच योजना पूर्ण करावयाची आहे व यासाठी पाणी पुरवठा व स्वचता विभाग, शासन निर्णय, क्र. ग्रापाधो-११०९/प्र.क्र.१०४/पापु-०७, दिनांक १.ऑगस्ट २००९ मधील मार्गदर्शक सुचनांचा अवलंब करण्यात यावा.

११. कामाचे गुणवत्ता प्रमाणीकरण हे सबंधित कंत्राटदाराने परिसरातील स्थापत्य अभियांत्रिकी पदवी/पदविका महाविद्यालयाकडून अथवा जिल्हा परिषदांच्या अभियंत्यांमार्फत करुन घ्यावे.

१२. योजनेतील यांत्रिकी कामे तपासण्याची जबाबदारी उप अभियंता (यांत्रिकी),भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,जिल्हा परिषद कार्यालयाची राहील. त्यांनी योजनेसाठी आवश्यक साहित्य सामुग्री - विद्युतपंप संच, HDPE पाण्याची टाकी, HDPE पाईप्स इत्यादी साहित्य सामुग्रीची खरेदी संचालनालयाने निश्चीत केलेल्या व जोडपत्र -२ मधे नमुद केलेल्या तांत्रीक

विनिर्देशानुसार केली असल्याबाबत शहानिशा करावी. विद्युत पंपाची उभारणी करणपुर्वी अस्तित्वातील हातपंप दुरुस्त करुन घेण्यात यावा, नियमित विद्युत पुरवठा प्राप्त करुन घेण्यात यावा तसेच टेस्ट रिपोर्टही घेण्यात यावा ह्या जबाबदा-या त्या कार्यालयाने पार पाडाव्यात.

१३. विंधण विहिर भुजल पुनर्भरणाच्या उपाय योजना वरिष्ठ भूवैज्ञानिक यांच्या तांत्रिक सल्ल्याने पार पाडाव्यात.

१४. ज्या वाड्या-वस्त्या मधील प्रस्तावित शासकीय विंधण विहिरी खाजगी जागेत घेण्यात आलेल्या असतील तर विद्युत महामंडळांकडुन नियमित विद्युत पुरवठा प्राप्त करुन देण्यासाठी जागा मालकांना बक्षीसपत्रासाठी होणारा खर्च योजनेतुन देय राहील. ही रक्कम ग्रामपंचायती मार्फत अदा करण्यात यावी.

***<u>लोकवर्गणी :</u>***

प्रस्तुत योजना पेयजल स्त्रोत शाश्वततेअंतर्गत भूजल पुनर्भरणावर आधारीत असल्याकारणाने या योजनेसाठी लोकवर्गणीची अट असणार नाही.

तथापी ,योजना हस्तांतरणानंतर भविष्यातील देखभाल दुरुस्ती, विजेची देयके अदा करणे व इतर अनुषांगिक बाबींवरील सर्व खर्चाची जबाबदारी ग्रामपंचायतीची असेल, याबाबतचे ग्रामपंचायतीचे संमती पत्र घेण्यात यावे.

***<u>निधी :</u>***

या योजनेसाठी केंद्र शासनाच्या राष्ट्रीय ग्रामीण पेयजल कार्यक्रम (स्त्रोत शाश्वती) या कार्यक्रमाखाली प्रत्यक्ष कामाच्या अंमलबजावणी व सहाय्यक कामांसाठी अनुदान उपलब्ध होईल. या योजनेसाठी प्रती योजना रुपये २.५० लक्ष मर्यादा असून त्यापेक्षा जास्त खर्च अपेक्षित नाही.

जिल्हास्तरीय समितीच्या संनियंत्रणात्मक कामासाठी आवश्यक वाहने प्रकल्प कालावधी साठी भाड्याने लावणे, कंत्राटी अभियंत्यांचे मानधन देणे,निविदा प्रसिद्धी खर्च, इ.खर्च या निधीतुन भागविण्यात यावा.

तथापी, हा सर्व खर्च योजनेच्या खर्चाच्या ५% मर्यादेत राहील याची दक्षता घेण्यात यावी. विद्युत कंपन्यांकडुन नियमित विद्युत पुरवठा प्राप्त करुन देण्यासाठी जागामालकांना बक्षीसपत्रासाठी होणारा खर्च समितीच्या मान्यतेने देय राहील.

***<u>अनुदान वितरण कार्यप्रणाली :</u>***

प्रस्तुत योजनांसाठी शासनाद्वारे संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचेकडे सर्व अनुदान उपलब्ध करुन दिले जाईल. जिल्हा समितीद्वारे मंजूर कामासाठी आवश्यक अनुदानाची

मागणी वरिष्ठ भूवैज्ञानिक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा यांनी सादर केल्यानंतर संचालक, भूजल सर्वेक्षण आणि विकास यंत्रणा, पुणे यांचेकडून संबंधित जिल्हयांना अनुदान वर्ग करण्यात येईल.

***योजनेचे हस्तांतरण :-***

योजनेची कामे पूर्ण होऊन योजना कार्यरत झाल्यानंतर योजना राबविणा-या समितीने योजना ग्रामपंचायतीकडे पूर्णपणे हस्तांतरीत करावी.

योजनेच्या कामाचे समन्वयक म्हणून सह संचालक (अभियांत्रिकी) व सह समन्वयक म्हणून मुख्य खोदन अभियंता, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा हे काम पाहतील. तसेच योजना राबवितासाठी जिल्हा परिषदांना आवश्यक ते तांत्रिक मार्गदर्शन करतील. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे यांच्यावर या योजनेच्या प्रगती व संनियंत्रणाची जबाबदारी सोपविण्यात येत आहे.

***पाणीपट्टी व योजनेची देखभाल दुरुस्ती :-***

कार्यान्वित योजना ग्रामपंचायतीस हस्तांतरीत केल्यानंतर ती सुरळीत पणे सुरु असावी यासाठी हस्तांतरणानंतर भविष्यातील देखभाल दुरुस्ती, विजेची देयके अदा करणे व इतर अनुषांगिक बाबींवरील सर्व खर्च व जबाबदारी ग्रामपंचायतीची असेल. याकरिता पाणीपट्टीच्या स्वरुपात निधीगोळा करण्यासाठी ग्रामपंचायतीने प्रत्येक योजनेसाठी स्थानिक स्तरावर वाडी-वस्तीतील योजनेच्या लाभधारकांची उपसमिती गठीत करावी. ही उपसमिती त्या योजनेपुरते पाणी पट्टीचे दर निश्चित करुन गोळा होणा-या निधीतून वीजेची देयके भागविणे व देखभाल दुरुस्ती संबधित सर्व कामांवरील खर्चाबाबत निर्णय घेईल. तथापी या बाबत प्रचलित शासन संदर्भान्वये अंमलबजावणी करण्यात यावी. हातपंपाची व वीज पंपाची स्वतंत्र वर्गणी या योजनेस लागु राहाणार नाही.

२. हा शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या बेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संगणक संकेतांक २०१००१११७३६०१००१ असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

सही/-

(सु.वि. कोळेकर )

उप सचिव, महाराष्ट्र शासन

प्रति,

१. विभागीय आयुक्त, सर्व.
२. जिल्हाधिकारी (सर्व )
३. संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे
४. मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद, सर्व
५. सह संचालक (अभि.) भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे.

६. उपसंचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, सर्व
७. मुख्य खोदन अभियंता, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे / नागपूर
८. कार्यकारी अभियंता, ग्रामीण पाणी पुरवठा विभाग, जिल्हा परिषद, सर्व.
९. वरिष्ठ भूवैज्ञानिक , भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,सर्व
१०. उप अभियंता (यांत्रिकी), यांत्रिकी उप विभाग, जिल्हा परिषद सर्व.
११. सर्व नियंत्रक अधिकारी, पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, मंत्रालय, मुंबई
१२. पाणी पुरवठा व स्वच्छता विभागातील सर्व कार्यासने.
१३. निवड नस्ती पापु-१५

## जोडपत्र -१

*जिल्हास्तरीय समिती - रचना व कार्यपध्दती*

***रचना :-***

पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय क्र. ग्रापापु-१००१/प्र.क्र.३३०/पापु-०७/मंत्रालय,मुंबई ४०००३२ दि.१४ फ़ेब्रु. २००२ नुसार शिवकालीन पाणी साठवण योजना राबविणारी समितीच ही योजना देखील राबविल. तथापी या योजनेपुरता उप अभियंता (यांत्रिकी), भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा,जिल्हा परिषद यांचाही या समितीमध्ये सहभाग असेल.

***कार्यपध्दती :-***

- गांव निवडीची प्रक्रिया पूर्ण करणे.
- शासन व संचालक, भूजल सर्वेक्षण व विकास यंत्रणा, पुणे, यांचेकडून प्राप्त होणा-या सूचनांनुरुप जिल्हयात योजनेची अंमलबजावणी व संनियंत्रण करणे.
- पाणी पुरवठा व स्वच्छता विभाग, शासन निर्णय, क्र. ग्रापाधो- ११०९/प्र.क्र.१०४/पापु-०७/दिनांक १ ऑगस्ट २००९ मधील मार्गदर्शक सुचनांचा अवलंब करण्यात यावा.

## जोडपत्र -२

### *योजनेसाठी आवश्यक साहित्य सामुग्रीचे तांत्रीक विनिर्देश व कामाचा तपशिल*

| *अ.क्र.* | *योजनेसाठी आवश्यक साहित्य सामुग्रीचे तांत्रीक विनिर्देश व कामाचा तपशिल* |
|---|---|
| १ | विंधणविहिरीची क्षमता चाचणी घेणे. |
| २ | हातपंपाची दुरुस्ती करणे. |
| ३ | क्षमता चाचणीसाठी हातपंप काढुन परत बसवीणे. |
| ४ | हातपंपाचे दुहेरी पंपात रुपांतर करणेसाठी १ ते २ अश्वशक्तीचा सिंगल फेजचा विद्युतपंप संच पुरवठा करणे.<br>यामधे खालील साहित्याचा समावेश असेल.<br>• १ ते २ अश्वशक्तीचा सिंगल फेजचा विद्युतपंप. IS : ८०३४ प्रमाणे.<br>उत्सर्ग : कमाल २० ते ३० लिटर्स प्रती मिनिट. ७० मिटर हेडसाठी<br>• २.५ -- ४ मि.मि.$^{२}$ सबमर्सिबल केबल.फ्लॅट - थ्री कोर. IS : ६९४ प्रमाणे.<br>• कंट्रोल पॅनेल रेन प्रिव्हेन्टीव्ह बॉक्ससह व दोन लोखंडी ॲंगल्ससह सोबत जोडलेल्या संकल्प चित्रानुसार.<br>• अर्थींग मटेरीअल.<br>हातपंपाचे दुहेरी पंपात रुपांतर करणेसाठी खालील कामासह.<br>• सिंगल फेज विद्युतपंपाची व हातपंपाची उभारणी करणे,स्पेशल वॉटर चेंबर व स्टेनलेस स्टीलचे बॉटम निप्पल (सोबत जोडलेल्या संकल्प चित्रानुसार) बसवीणे,<br>• कंट्रोल पॅनेल उभारणी करणे (टेस्ट रिपोर्टसह.)<br>• टाकी मध्ये पाणी चढविण्याची चाचणी देणे<br><br>उपरोक्त सर्व साहित्याच्या व विद्युतपंपासाठी २५ मि.मि.व्यासाचा एचडीपीई पाईपच्या वाहतुक खर्चासह. |
| ५ | ५००० लिटर्स क्षमतेची एचडीपीई साठवण टाकी IS : १२७०२ प्रमाणे पुरवठा करणे. |
| ६ | विद्युतपंपासाठी २५ मि.मि.व्यासाचा एचडीपीई पाईप (८० पीई-१० पीएन.)<br>IS: ४९८४ प्रमाणे पुरवठा करणे. |
| ७ | • ५००० लिटर्स क्षमतेच्या एचडीपीई साठवण टाकीसाठी आवश्यक उंचीचा मनोरा तयार करणे,साठवण टाकी मनो-यावर उभारणी करणेसह व साठवण टाकीच्या वाहतुकीसह. |

| | |
|---|---|
| | • डयुअल पंपाची पाईप लाईन हातपंपाच्या ओटयाखालुन काढण्यासाठी आवश्यक खोदकाम व बांधकामासह.<br>• स्थऴपरत्वे तपशीलवार अंदाजपत्रकानुसार सर्व स्थापत्य कामे.<br>• दुहेरी पंप ते साठवण टाकी पर्यंत उध्दरण नलिका टाकणे.<br>• साठवण टाकी ते घरोघरी नळ जोडणीपर्यंत वितरण व्यवस्था करणे.( साधारणत : ३० कुटूंबासाठी.) सर्व आवश्यक प्लंबींग कामे करणे. |
| ८ | छतावरील पावसाच्या पाण्याचे संकलन करुन विंधण विहिरीचे पुनर्भरण करणे. |
| ९ | विद्युत कंपन्यांकडुन नियमीत सिंगल फेजचा विद्युत पुरवठा प्राप्त करुन घेणे. |
| १० | कंत्राटी अभियंत्यांचे मानधन,<br>पर्यवेक्षणासाठी वाहनाचे भाडे,<br>निविदा प्रसिध्दी ,<br>इतर खर्च,<br>योजनेच्या एकुण अंदाजपत्रकाच्या ५ % |

* माहितीपत्रक सोबत जोडण्यात आले आहे.Information Book let for Dual Pump System.ppt